**अधिक्षक अभियंता, कृष्णा पाणी तंटा लवाद विशष कक्ष, पुणे या कार्यालयास विशेष बाब म्हणून संक्षिप्त देयकाव्दारे रक्कम काढण्यास मंजूरी देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
शासन निर्णय क्र. संकिर्ण - २०११/( २६६/११ )/जसंनि
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
दिनांक :३०/१२/२०११

**प्रस्तावना :**

नविन कृष्णा पाणी तंटा लवादासमोर महाराष्ट्र राज्याचा पाण्याच्या मागणी संदर्भात बाजू मांडण्यासाठी शासन निर्णय क्र. आढावा १००३/(२४५/०३) आ (प्रशि) दिनांक २३/०७/२००३ अन्वये अधिक्षक अभियंता, कृष्णा पाणी तंटा लवाद विशेष कक्ष, पुणे या कार्यालयाची स्थापना करण्यात आली आहे. लवादाच्या कामासाठीचा खर्च हा अत्यंत तातडीच्या स्वरुपाचा असल्याने लवादाच्या कामावरील खर्चाची देयके अदा करण्यासाठी शासनाने "एक विशेष बाब" म्हणून संक्षिप्त देयकाव्दारे रक्कम काढण्यास दिनांक ०९/०८/२००४ च्या शासन निर्णयान्वये मान्यता दिली होती. नविन कृष्णा पाणी तंटा लवादासाठी कार्यरत विधीज्ञ व सल्लागार यांच्या थकीत देयकांची रक्कम संक्षिप्त देयकाव्दारे आहरित करण्यास मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचारधिन होता.

**शासन निर्णय :**

अधिक्षक अभियंता, कृष्णा पाणी तंटा लवाद विशेष कक्ष, पुणे यांनी सन २०११-१२ मधील मार्च २०१२ पर्यंत लागणा-या एकूण रु. २३९.३० लक्ष इतकी रक्कमे पैकी एप्रिल २०११ ते सप्टेंबर २०११ या कालावधीत संक्षिप्त देयकाव्दारे खर्च झालेली रु. ४५.५० लक्ष इतकी रक्कम खर्च झाली आहे. सदर रक्कम वगळता उर्वरित रु. १९३.७० लक्ष पैकी जानेवारी २०१२ पर्यंत लागणारी सुमारे १ कोटी इतकी रक्कम "एक विशेष बाब" म्हणून संक्षिप्त देयकावर काढण्यास खालील अटींच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे.

१. यापूर्वी संक्षिप्त देयकाव्दारे रकमा काढल्या असल्यास त्याचे तपशीलवार देयक सादर करणे प्रलंबित नाही.

२. खर्च नियमित देयकाव्दारे करणे शक्य नसून त्यासाठी संक्षिप्त देयक सादर करणे अनिवार्य असल्याची खात्री करुन घेण्यात आली आहे.

३. प्रस्तावित देयकाचे तपशिलवार देयक विहीत मुदतीत (१ महिन्याच्या आत) सादर करण्याची जबाबदारी  अधिक्षक अभियंता, कृष्णा पाणी तंटा लवाद, विशेष कक्ष, पुणे यांची राहील.

४. मासिक निधी विवरणपत्रानुसार सदर रक्कम या महिन्यामध्ये खर्च करण्यास उपलब्ध आहे.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौ. संदर्भ क्र. ६६१/११/विनियम दिनांक १५/१२/२०११ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०११११२३००९१७४११२४१००१.असा आहें.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( प्र. म. अबनावे )
शासनाचे उप सचिव.

प्रतिः-

१) प्रधान सचिव, (जलसंपदा) यांचे स्विय सहाय्यक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२) सचिव, (लाक्षेवि) यांचे स्विय सहाय्यक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) सचिव, (ले. व को.) यांचे स्विय सहाय्यक, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) महालेखापाल, ( लेखापरिक्षा ) महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर.
५) महालेखापाल, ( लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर.
६) मुख्य अभियंता, (कृपातंल) व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) संचालक, लेखां व कोषागारे, संचानालय, मुंबई.
८) आंतरवित्त सल्लागार व उप सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) उप सचिव, (जसं.) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) अधिक्षक अभियंता, कृष्णा पाणी तंटा लवाद, विशेष कक्ष, पुणे.
११) कार्यकारी अभियंता, कृष्णा पाणी तंटा लवाद, विशेष कक्ष, पुणे.
१२) कोषागार अधिकारी, पुणे.
१३) विनियम कार्यासन, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४) जसंनि संग्रहार्थ.